**सरळसेवा सहायक (आताचे नांव सहायक कक्ष अधिकारी ) (मुख्य) परीक्षा-२०१५**
**महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने शिफारस केलेल्या उमेदवारांचे मंत्रालयीन प्रशासकीय विभागात फेरनियतवाटप.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**क्रमांक : एएससी १४१६/प्र.क्र. १९/१४-अ,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दूरध्वनी क्रमांक : ०२२-२२७९४१७२.
दिनांक : ०३ जानेवारी, २०१७

**वाचा:-** (१) सामान्य प्रशासन विभाग, शासन ज्ञापन क्रमांक : एएससी १४१६/प्र.क्र.१९/१४-अ, दिनांक २९.२.२०१६
(२) सामान्य प्रशासन विभाग, शासन ज्ञापन क्रमांक : एएससी १४१६/प्र.क्र.१९/१४-अ, दिनांक १५.१०.२०१६.

**शासन ज्ञापन**

महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत घेण्यात आलेल्या सरळसेवा सहायक (मुख्य) परीक्षा २०१५ मधून आयोगाने केलेल्या शिफारशीनुसार श्री.विठ्ठल सत्यवान पाटोळे (गुणवत्ता क्रमांक ६५/२०१५)(अजा) यांचे संदर्भांकित क्रमांक १ येथील दिनांक २९.२.२०१६ च्या ज्ञापनान्वये सामान्य प्रशासन विभागातील सहायक (आताचे पदनाम सहायक कक्ष अधिकारी) पदावर नियतवाटप करण्यात आले होते.

२. त्यांनी केलेल्या विनंतीनुसार ते ज्या दिवशी सदरहू पदावर रुजू होतील त्या दिनांकापासून त्यांची सेवाज्येष्ठता धरण्यात येईल या अटीच्या अधीन राहून त्यांना अंतिमत: दिनांक ३०.९.२०१६ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती. तद्नंतर संदर्भ क्रमांक २ येथील दिनांक १५.१०.२०१६ च्या ज्ञापनान्वये प्रशासकीय कारणास्तव त्यांचे अल्पसंख्याक विकास विभागातील सहायक कक्ष अधिकारी पदावर फेरनियतवाटप करण्यात आले. त्यानुसार ते दिनांक १५.१०.२०१६ रोजी अल्पसंख्याक विकास विभागात रुजू झाले. मात्र, दिनांक १८.१०.२०१६ ते २१.१०.२०१६ व दिनांक २५.१०.२०१६ ते ३०.११.२०१६ या कालावधीत ते विभागात गैरहजर होते व दिनांक १.१२.२०१६ रोजी ते अल्पसंख्याक विकास विभागात रुजू झाले असता, विभागाने श्री.पाटोळे यांना नियुक्ती देण्यास व हजर करुन घेण्यास असमर्थता दर्शविल्यामुळे त्यांचे प्रशासकीय कारणास्तव पुन:श्च रुजू झाल्याच्या दिनांकापासून सामान्य प्रशासन विभागातील सहायक कक्ष अधिकारी पदावर नियतवाटप करण्यात येत आहे.

३. संदर्भाधिन क्रमांक १ येथील ज्ञापनातील परिच्छेद २ मधील इतर अटी व शर्ती (सेवाज्येष्ठता वगळता) या ज्ञापनासाठीही कायम राहतील.

४. सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक क्रमांक २०१७०१०३१२४३२५९६०७ असा आहे. सदर ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Gajanan Bhimrao Gurav

Digitally signed by Gajanan Bhimrao Gurav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration, postalCode=400032, st=Andhra Pradesh, 2.5.4.20=8a5b973b0795ae988a7c005050f9180a8021798a5c1ed41ada8a72725a47b4f0, cn=Gajanan Bhimrao Gurav
Date: 2017.01.03 12:46:41 +05'30'

**( ग.भि.गुरव )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति** :- श्री.विठ्ठल सत्यवान पाटोळे यांना (ई मेलद्वारे)

विभागासाठी सहपत्रे :-
(१) उमेदवाराने आयोगास सादर केलेल्या आवेदनपत्राची संगणकीय प्रत.
(२) सरळसेवा सहायक (मुख्य) परीक्षा २०१५ साठी महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने दिलेल्या जाहिरातीची प्रत (अधिसूचना)
(३) प्रतिवेदन नमूना

**प्रत :-**

(१) अवर सचिव (आस्थापना), अल्पसंख्याक विकास विभाग/सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
(२) * सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग.
(३) सामान्य प्रशासन विभाग/१४-अ (संग्रहार्थ)
*पत्राने.